महाराष्ट्र शासन,

गृह विभाग,

शासन निर्णय, क्र. एमआयएम १०९१/३७[१२३]/पीआरएस-२,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ६ डिसेंबर, १९९३.

वाचा : कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. एफवायपी ,वायो/१९९३-९४/कक्ष-७, दि. २७.५.१९९३.

निर्णय :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र १०९२/प्र.क्र. ११३/९२/विनिमय दि. १ जून १९९२ मधील भाग पहिला, उप विभाग तीन, अनुक्रमांक ४, नियम २७[२] अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन "कारागृह उद्योगाचा विकास व कारागृह शेतीचे आधुनिकीकरण" या योजनांतर्गत खालील या बाबींना कामे व साहित्य खरेदी/ शासन या आदेशाद्वारे मंजुरी देत आहे.

१] कारागृह उद्योगाचा विकास :-

[१] बँडेज कापड बनविण्याची मशिनरी ॲक्सेसरीज सह लहान कार्डींग मशिन, रोलर मशिन, इत्यादीसह [१ युनिट] रु. १,५०,०००/-

[२] कार्डींग मशिन, कापूस पिंजण्यासाठी मशिन, हत्यारे, अवजारांसह [१ युनिट] रु. १,००,०००/-

[३] वह्या उत्पादनासाठी मशिनरी ॲक्सेसरीज [१ युनिट] स्टीचींग मशिन, कटींग मशिन, बाईंडींग प्रेस इ. सह रु. १,५०,०००/-

[४] खडू उत्पादनासाठी मशिनरी ॲक्सेसरीजसह [गनमेटल डाईज, ट्रेजसह] [ १ युनिट प्रत्येकी] रु. ७५,०००/-

[५] पॉवर प्रेस [१९९१-९२ मध्ये नागपूर व नाशिक रोड येथे खरेदी केलेल्या ] त्यासाठी निरनिराळी डाईजसाठी तरतूद रु. ८०,०००/-

[६] मिरची, हळद पावडर मशिनरी सर्व हत्यारे औजारासह [ १ युनिट] रु. १,००,०००/-

२] कारागृह शेतीची कामे :-

[१] जमीन सपाटीकरण व प्लॉट तयार करणे रु. ४०,०००/-

[२] इतर कृषि उत्पादक योजना [वेल वर्गीय भाजी करिता मांडव घालणे] रु. १,४०,०००/-

एकूण खर्च रु. ८,३५,०००/- [रुपये आठ लाख पस्तीस हजार फक्त].

/ प्रेणा-या

२. अ) या बाबींवर होणारा खर्च वेळोवेळी लावण्यात आलेल्या कपातीनंतर उर्वरित अनुदानातून भागविण्यात यावा.

ब) यंत्रसामुग्रीची खरेदी करताना विहित खरेदी पध्दतीने काटेकोरपणे अंमलात आणावी.

३. सदर खर्च सन १९९३-९४ या वर्षासाठी "सामाजिक सेवा" या शिर्षा अंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा आदेश नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनुक्रमे क्र. ३५७/यो-१६, दि. १.१०.१९९३ व क्र. सीआर ७५२/९३/व्यय-८, दि. १०.११.१९९३ च्या अनौपचारीक संदर्भान्वये त्या विभागांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ म. गुं. खाबडे ]

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
कारागृह उप महानिरीक्षक [मुख्यालय], महाराष्ट्र राज्य, पुणे,
महालेखापाल-१/२, महाराष्ट्र [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई, नागपूर,
महालेखापाल-१/२, महाराष्ट्र [लेखा परिक्षा], मुंबई, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व अधिक्षक, मध्यवर्ती कारागृहे,
सर्व अधिक्षक, जिल्हा कारागृहे,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
नियोजन विभाग, योजना-१६,
वित्त विभाग, व्यय-८,
गृह विभाग, बीयुडी-१,
निवड नस्ती.